उपसंचालक आरोग्य सेवा (प्राआकेंद्र/उपकेंद्र/ दवाखाने) यांच्या अधिपत्याखालील आयटीडीपी क्षेत्रातील ग्रामीण रुग्णालयांतर्गत प्रयोगशाळा तंत्रज्ञांची (पाणी नमुने) ३१ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत

## महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अपदे २०१८/प्र.क्र.४७०/आरोग्य-३ अ

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई ४०० ००१
दिनांक: ०५ डिसेंबर, २०१८

**वाचा -**

१. शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : अपदे-२०१८/प्र.क्र.१९५/आ-३ अ, दि.३०/५/२०१८
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई, यांचे पत्र क्र.संसाओ/आयटीडीपी/१३०२-०३, दि.२०/११/२०१८
३. शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.७/९/२०१८

**शासन निर्णय-**

संदर्भाधिन क्र.१ येथील शासननिर्णय क्र.अपदे २०१८/प्र.क्र.१९५/ आरोग्य-३अ, दि.३०/५/२०१८ अन्वये उपसंचालक आरोग्य सेवा (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने) यांच्या अधिपत्याखालील आयटीडीपी क्षेत्रातील ग्रामीण रुग्णालयांतर्गत प्रयोगशाळा तंत्रज्ञांची (पाणी नमुने) ३१ अस्थायी पदे चालू ठेवण्यास दि.१/३/२०१८ ते दि.३०/९/२०१८ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

२. संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावास अनुसरुन सदर पदांना दि.१/१०/२०१८ ते दि.२८/२/२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर ३१ अस्थायी पदाना शासन निर्णय वित्त विभाग क्र पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि.७/९/२०१८ मधील अटीच्या अधीन राहून दिनांक १/१०/२०१८ ते दिनांक २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खाली दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-१९ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागवण्यात यावा.

**मागणी क्रमांक आर-१**

**२२१० - वैद्यकिय सेवा व सार्वजनिक आरोग्य**

**०६ - सार्वजनिक आरोग्य**

**००१-संचालन व प्रशासन**

**० ०१ (०८) प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रा.रु.इतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)**

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ७ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२८१७०८४८५४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.12.05 12:05:40 +05'30'

**(रा.शा.कौरते )**
(अवर सचिव, महाराष्ट्र शासन)

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व लेखापरिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
२) आयुक्त, आरोग्य सेवा, आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, संचालनालय, मुंबई.
४) सहसंचालक, आरोग्य, रुग्णालय (प्राआकेंद्र/उपकेंद्र/दवाखाने), मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा (हिहवजरो), पुणे
६) उपसंचालक, आरोग्य सेवा, मंडळे नाशिक/अकोला/नागपुर/लातूर/ठाणे
७) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/अमरावती/गडचिरोली/नांदेड/ठाणे
८) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, नाशिक/अमरावती/ गडचिरोली/नांदेड/ठाणे
९) वित्त विभाग (व्यय १३)/वित्तीय सुधारणा-१,/आ.पु.क मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव/कक्ष अधिकारी (सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प), सार्वजनिक अरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (आरोग्य-३ अ) तारांकित प्रश्न क्रमांक